**कोषागारातून रोख देय अनुदान**

केंद्र पुरस्कृत स्वच्छ भारत मिशन (ग्रा.) अंतर्गत सन २०१६-१७ या आर्थिक वर्षासाठी केंद्र हिश्श्याचे सर्वसाधारण घटकासाठी अनुदान वितरीत करण्याबाबत...

**(लेखाशीर्ष २२१५ ९८३५)**

**महाराष्ट्र शासन**

**पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग**

शासन निर्णय क्रमांकः स्वभामि-१२१६/प्र.क्र.३९/पापु-१६

७ वा मजला, जी.टी. रूग्णालय संकुल,

लोकमान्य टिळक मार्ग, मंत्रालय, मुंबई- ४०० ००१.

दिनांक: १९जानेवारी, २०१७

वाचा

१. **केंद्र शासनाचे मंजूरी आदेश:** दि.१ डिसेंबर, २०१६.
२. **केंद्र शासनाच्या स्वच्छ भारत मिशन (ग्रा.) संदर्भातील मार्गदर्शक सूचना:** दि.१८ डिसेंबर, २०१४.
३. **शासन परिपत्रक क्रमांकः** स्वभामि-२०१४/प्र.क्र.२७/पापु-०८, दि.७ नोव्हेंबर, २०१४.
४. **पाणी पुरवठा व स्वच्छता विभागाचे पत्र क्रमांक:** स्वभामि-२०१५/प्र.क्र.१९४/पापु-०८, दि.११ जानेवारी, २०१६.
५. **पाणी पुरवठा व स्वच्छता विभागाचा शासन निर्णय क्रमांक:** स्वभामि-१२१६/प्र.क्र.३९/ पापु-१६, दि.५ जुलै, २०१६.
६. **पाणी पुरवठा व स्वच्छता विभागाचे शासन शुद्धिपत्रक क्रमांक:** स्वभामि-१२१६/ प्र.क्र.३९/पापु-१६, दि. १८ जुलै, २०१६.
७. **वित्त विभागाचे शासन परिपत्रक क्रमांकः** अर्थसं-२०१६/प्र.क्र.८९/अर्थ-३, दि.२० एप्रिल, २०१६.

**प्रस्तावना**

केंद्र पुरस्कृत स्वच्छ भारत मिशन (ग्रा.) च्या केंद्र हिश्यासाठी २२१५ ९८३५ या लेखाशीर्षाखाली सन २०१६-१७ मध्ये अर्थसंकल्पीत करण्यात आलेल्या निधीपैकी रू.१९८७५.४३ लक्ष (रू.एकशे अठ्ठयान्नव कोटी पंच्याहत्तर लक्ष त्रेचाळीस हजार फक्त) इतके अनुदान संबंधित अंमलबजावणी यंत्रणांना उपरोक्त वाचा मधील क्र.५ व ६ येथील शासन निर्णय व शासन शुद्धिपत्रकांन्वये वितरीत करण्यात आलेले आहेत. उक्त वाचा मधील क्र.१ येथील केंद्र शासनाच्या मंजूरी आदेशान्वये रू.१९६७०.७७ लक्ष (एकशे

शहान्नव कोटी सत्तर लक्ष सत्याहत्तर हजार फक्त) इतके अनुदान स्वच्छ भारत मिशन (ग्रा.) च्या केंद्र हिश्श्याच्या सर्वसाधारण घटकासाठी राज्यास प्राप्त झालेले आहे. केंद्र पुरस्कृत स्वच्छ भारत मिशनच्या केंद्र हिश्श्यासाठी सर्वसाधारण घटकाच्या २२१५ ९८३५ या लेखाशीर्षाखाली सन २०१६-१७ मध्ये अर्थसंकल्पीत करण्यात आलेल्या निधीपैकी रू.१९६७०.७७ लक्ष एवढा निधी वित्त विभागाने अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीद्वारे उपलब्ध करून दिलेला आहे. सदर उपलब्ध निधी वितरीत करण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता, याबाबत पुढीलप्रमाणे निर्णय घेण्यात आला आहे.

**<u>शासन निर्णय</u>**

सन २०१६-१७ या आर्थिक वर्षाकरिता केंद्र पुरस्कृत स्वच्छ भारत मिशन (ग्रा.) साठी केंद्र हिश्श्याच्या अनुदानांतर्गत सर्वसाधारण घटकासाठी (Normal allocation) स्वच्छता कार्यक्रम राबविण्यासाठी निधी अर्थसंकल्पीत करण्यात आला आहे. केंद्र शासनाच्या मार्गदर्शक सूचनेनुसार राज्यस्तरावर माहिती, शिक्षण व संवाद (IEC) यासाठी ०.२५ %, मानवी संसाधन विकास (HRD) यासाठी ०.२५ % व प्रशासकीय बाबींसाठी ०.२० % असे एकूण निधीच्या ०.७० % निधी ठेवणे आवश्यक आहे. यानुसार रू.१९६७०.७७ लक्ष एवढ्या निधीपैकी रू.१९५३३.०७ लक्ष एवढा निधी जिल्हा परिषदांना वितरीत करण्यात येत असून रू.१३७.७० लक्ष (०.७० % च्या प्रमाणात) निधी राज्यस्तरावर संचालक, पाणी व स्वच्छता सहाय्य संस्था यांचे अधिनस्त ठेवण्यात येत आहे. जिल्हा परिषदांना वितरीत करावयाचे रू.१९५३३.०७ लक्ष (एकशे पंच्यान्नव कोटी तेहतीस लक्ष, सात हजार फक्त) इतके अनुदान संबंधित मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद यांना सोबत जोडलेल्या विवरणपत्रातील स्तंभ क्र. ४ नुसार अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीद्वारे रोख स्वरूपात मुक्त करण्यात येत आहे. सदर अनुदान हे सशर्त मंजूर करण्यात येत आहे.

२. "केंद्र शासनाकडून माहिती, शिक्षण व संवाद (IEC), मानवी संसाधन विकास (HRD) व प्रशासकीय बाबी या घटकांसाठी प्राप्त झालेली रू. १३७.७० लक्ष (०.७० % च्या प्रमाणात) एवढी रक्कम आहरण व संवितरण अधिकारी तथा वित्त नियंत्रक, रिफॉर्म सपोर्ट व प्रोजेक्ट मॅनेजमेंट युनिट (जलस्वराज्य प्रकल्प टप्पा-२), पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई यांचेकडे BEAMS प्रणालीवर वितरीत करण्यात येत आहे. सदर रक्कम रू.१३७.७० लक्ष (रूपये एक कोटी, सदतीस लक्ष, सत्तर हजार फक्त) अधिदान व लेखाधिकारी कार्यालय, मुंबई यांच्या कार्यालयातून आहरीत करण्यासाठी आहरण व संवितरण अधिकारी तथा वित्त नियंत्रक, रिफॉर्म सपोर्ट व प्रोजेक्ट मॅनेजमेंट युनिट (जलस्वराज्य प्रकल्प टप्पा-२) (श्री. एन.व्ही. कोंगले), पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग,मंत्रालय, मुंबई यांना व नियंत्रक

अधिकारी म्हणून उप सचिव तथा प्रकल्प संचालक, सुधारणा सहाय्य व प्रकल्प व्यवस्थापन कक्ष (श्री. रूचेश जयवंशी), पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई यांना प्राधिकृत करण्यात येत आहे. आहरण व संवितरण अधिकारी तथा वित्त नियंत्रक, रिफॉर्म सपोर्ट व प्रोजेक्ट मॅनेजमेंट युनिट (जलस्वराज्य प्रकल्प टप्पा-२) (श्री. एन.व्ही. कोंगले), पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई यांनी रू. १३७.७० लक्ष इतकी रक्कम अधिदान व लेखाधिकारी, मुंबई यांच्या कार्यालयातून आहरीत करून स्वतंत्र धनादेशान्वये संचालक, पाणी व स्वच्छता सहाय्य संस्था, नवी मुंबई यांच्याकडे सुपूर्द करावी".

३. या शासन निर्णयाद्वारे मुक्त केलेली रक्कम पुढील अटींवर मंजूर करण्यात येत आहे.

अ) या शासन निर्णयाद्वारे मंजूर केलेले अनुदान ज्या करणासाठी मंजूर करण्यात आले आहे त्याच करणासाठी खर्च करण्यात यावे. संबंधित जिल्हा परिषदा/संस्था यांनी या शासन निर्णयाद्वारे मुक्त केलेला निधी, या कार्यक्रमासाठी उघडलेल्या स्वतंत्र बँक खात्यात जमा करावा.

आ) संबंधित जिल्हा परिषदेने/संस्थेने या शासन निर्णयाद्वारे मंजूर करण्यात आलेल्या अनुदानापेक्षा जास्त खर्च करू नये.

इ) अट क्र.३-अ आणि ३-आ यांची पुर्तता झाली आहे याची खात्री करण्यासाठी, महालेखापाल-१, मुंबई व महालेखापाल-२, नागपूर यांच्याकडे जिल्हा परिषदेच्या संबंधित अधिकारी/कर्मचारी यांनी लेखे तपासणीसाठी सर्व कागदपत्रे उपलब्ध करून द्यावीत.

ई) सदर रक्कम केंद्र शासनाने ठरवून दिलेल्या मार्गदर्शक सूचनांमधील तरतूदींनुसार तसेच या संदर्भात राज्य शासनाने वेळोवेळी निर्गमित केलेल्या सूचनेप्रमाणे/ आदेशाप्रमाणे खर्च करण्यात यावी.

उ) ग्रामीण स्वच्छता कार्यक्रमाचा विहित नमून्यातील मासिक प्रगती अहवाल प्रत्येक महिन्याच्या १० तारखेपर्यंत शासनास पाठविण्याची दक्षता घ्यावी. शासनाने वेळोवेळी निर्गमित केलेल्या सूचनेप्रमाणे जिल्हा परिषदांनी या अनुदानाच्या खर्चाचा महालेखापाल कार्यालयात नोंदविलेल्या खर्चाशी ताळमेळ घालावा व ताळमेळाचे अहवाल विहित कालावधीत या विभागातील पापु-०४, पापु-१६ व पापु-२० या कार्यासनांस सादर करावा.

ऊ) पाणी व स्वच्छता सहाय्य संस्था यांनी निधी वितरण, खर्च याबाबतची नोंद केंद्र शासनाच्या संकेतस्थळावर (IMIS) घेण्याची दक्षता घ्यावी.

ऋ) सदर रक्कम खर्च करताना वित्त विभागाचे शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०१६/प्र.क्र.८९/अर्थ-३, दि.२० एप्रिल, २०१६ मधील अटी व शर्तींचे काटेकोरपणे पालन

करून आवश्यक बाबींची पुर्तता करून कार्यपूर्ती अहवाल/नमूद प्रमाणपत्रे शासनास त्वरीत सादर करावीत.

ऌ) सदर रक्कम खर्च झाल्यानंतर त्याचे उपयोगिता प्रमाणपत्र शासनास त्वरित सादर करावे.

४. हा खर्च "मागणी क्रमांक वाय-०२, २२१५ पाणी पुरवठा व स्वच्छता, ०२ जलनि:स्सारण व स्वच्छता, १०७ मलप्रणाल सेवा, (०२) ग्रामसफाई कार्यक्रम, (०२) (१०) निर्मल भारत अभियान केंद्र पुरस्कृत योजनेंतर्गत शौचालय बांधणे (सर्वसाधारण घटक) (केंद्र हिस्सा) (२२१५ ९८३५), ३१ सहायक अनुदाने(वेतनेतर) " या लेखाशीर्षाखाली घालावा.सदर अनुदान सशर्त मंजूर करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय वित्त विभागाचे शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०१६/प्र.क्र.८९/अर्थ-३, दि.२० एप्रिल, २०१६ अन्वये या विभागास प्रदान केलेल्या अधिकारात तसेच सदर परिपत्रकातील अटी व शर्तींच्या अधीन राहून मुक्त करण्यात येत आहे. सदर परिपत्रकातील परिच्छेद ७ ते १८ मधील तसेच परिशिष्टातील अ.क्र.९मधील तपासणीसुचीतील अ.क्र.१ ते १० मधील लागू असलेल्या अटी व शर्तीची पुर्तता होत असल्याचे प्रमाणीत करण्यात येत आहे.उपरोक्त रु.१९६७०.७७ लक्ष एवढा केंद्र निधी राज्याच्या एकत्रीत निधीत जमा झाल्याबाबतची खात्री वित्त विभागाच्या अर्थोपाय शाखेकडुन करण्यात आली आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०११९१३०६२१४४२८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Vasant Bhimrao Mane

Digitally signed by Vasant Bhimrao Mane
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Under Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Vasant Bhimrao Mane
Date: 2017.01.20 12:02:57 +05'30'

**(वसंत भि.माने)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रत,

१. प्रधान सचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
२. महालेखापाल, महाराष्ट्र- १/२ मुंबई/नागपूर (लेखा परीक्षा व अनुज्ञेयता)
३. विभागीय आयुक्त, सर्व.

४. उपायुक्त विकास, सर्व विभागीय आयुक्त यांचे कार्यालय.
५. जिल्हाधिकारी व सदस्य सचिव, जिल्हा नियोजन समिती सर्व.
६. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, सर्व.
७. संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई.
८. मुख्य लेखा परीक्षक, स्थानिक निधी लेखा, मुंबई/नागपूर.
९. संचालक, पाणी व स्वच्छता सहाय्य संस्था, (WSSO), बेलापूर, नवी मुंबई.
१०.उपमुख्य कार्यकारी अधिकारी (पा.व स्व.), जिल्हा परिषद, सर्व.
११.उप मुख्य लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा, जिल्हा परिषद, सर्व.
१२.जिल्हा कोषागार अधिकारी, जिल्हा परिषद, सर्व.
१३.मुख्य लेखा व वित्त अधिकारी, जिल्हा परिषद, सर्व.
१४.नियोजन विभाग, (का.क्र.१४४३) मंत्रालय, मुंबई.
१५.वित्त विभाग, (व्यय-३) मंत्रालय, मुंबई.
१६.कार्यासन क्र.पापु-०४, पापु-२०, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई.
१७.निवड नस्ती, कार्यासन पापु-१६.

# विवरणपत्र

**केंद्र पुरस्कृत स्वच्छ भारत मिशन (ग्रा.) अंतर्गत सन २०१६-१७ करिता केंद्र हिश्श्याच्या सर्वसाधारण घटकासाठी अनुदानाचे वितरण(लेखाशिर्ष २२१५ ९८३५).**

शासन निर्णय क्र.स्वभामि-१२१६/प्र.क्र.३९/पापु-१६, दि.१९ जानेवारी, २०१७ सोबतचे सहपत्र.

(रू.लाखांत)

| अ.क्र. | जिल्हा परिषद/ वासो | दि. ५जुलै, २०१६ रोजीच्या शासन निर्णयान्वये मुक्त केलेला निधी | या शासन निर्णयान्वये मुक्त करण्यात येत असलेला निधी |
|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ |
| १ | वासो | १३९.१० | १३७.७० |
| २ | ठाणे | ७०५.५० | ४३२.०० |
| ३ | रायगड | ३९१.३२ | १०८.०० |
| ४ | रत्नागिरी | १३६३.५७ | १०८०.०० |
| ५ | सिंधुदूर्ग | ८.१८ | ०.०० |
| ६ | पालघर | ३४२.४५ | २१६.०० |
| ७ | नाशिक | ९४१.०२ | ८६४.०० |
| ८ | धुळे | ६७१.८३ | ५७६.०० |
| ९ | नंदूरबार | ३४०.१० | २८८.०० |
| १० | जळगाव | ४८०.८२ | ६२२.८० |
| ११ | अहमदनगर | २११.५९ | १०८०.०० |
| १२ | पुणे | १३१०.८२ | २०८८.०० |
| १३ | सातारा | ६६८.५० | १२२४.०० |
| १४ | सांगली | १०३०.४१ | १२२४.०० |
| १५ | सोलापूर | १७४.७४ | ८१३.६० |
| १६ | कोल्हापूर | ५९०.५० | ६७८.८८ |
| १७ | औरंगाबाद | ७८७.०० | ६४८.०० |
| १८ | जालना | ५३५.९३ | ६२२.८० |
| १९ | परभणी | ६७५.५१ | ३६०.०० |
| २० | हिंगोली | १४४.९५ | ७२.०० |
| २१ | बीड | ६११.३२ | ६४८.०० |
| २२ | नांदेड | ३५६.५४ | ५०.४० |

| अ.क्र. | जिल्हा परिषद/ वासो | दि. ५जुलै, २०१६ रोजीच्या शासन निर्णयान्वये मुक्त केलेला निधी | या शासन निर्णयान्वये मुक्त करण्यात येत असलेला निधी |
|---|---|---|---|
| २३ | उस्मानाबाद | २०७.१२ | ७२.०० |
| २४ | लातूर | ८९५.८६ | ६६९.६० |
| २५ | अमरावती | २०७.०६ | १००८.०० |
| २६ | अकोला | १८३.२९ | ५०.४० |
| २७ | वाशिम | ३०५.७० | ५७६.०० |
| २८ | बुलढाणा | ५४०.९६ | ४३२.०० |
| २९ | यवतमाळ | २३९.५५ | ६६९.४४ |
| ३० | नागपूर | ११६०.९३ | ८११.१५ |
| ३१ | वर्धा | ९८४.४२ | ४३२.०० |
| ३२ | भंडारा | ८१७.३७ | २८८.०० |
| ३३ | गोंदिया | ७६७.२५ | २८८.०० |
| ३४ | चंद्रपूर | ८०९.३२ | ४६८.०० |
| ३५ | गडचिरोली | २७४.९० | ७२.०० |
| **एकूण** | | **१९८७५.४३** | **१९६७०.७७** |
| **अक्षरी रूपये** | | **एकशे अठ्ठ्यान्नव कोटी पंच्याहत्तर लक्ष त्र्येचाळीस हजार** | **एकशे शहान्नव कोटी सत्तर लक्ष सत्त्याहत्तर हजार** |

Vasant Bhimrao Mane

Digitally signed by Vasant Bhimrao Mane
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Under Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Vasant Bhimrao Mane
Date: 2017.01.20 12:06:23 +05'30'

(वसंत भि.माने)
अवर सचिव, महाराष्ट्र शासन